**<u>२०१०-२०११ या आर्थिक वर्षापासून</u>**
**डोंगरी विभाग विकास कार्यक्रमांतर्गत समाविष्ट असणाऱ्या पूर्णगट डोंगरी तालुक्यास आणि उपगट डोंगरी तालुक्याच्या निधीमध्ये वाढ करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग
शासन निर्णय, क्रमांक-डोंविका-२०१०/प्र.क्र.५१/का.१४८३.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १० जून, २०१०

पहा :-१) शासन निर्णय,नियोजन विभाग क्रमांक-डोंविका-२००९/प्र.क्र.६/का.१४८३, दि. १८ जानेवारी,२०१०.

**<u>प्रस्तावना</u> :-**

डोंगरी विभागाच्या विकासासाठी खास कार्यक्रम राज्यामध्ये सन १९९१-९२ पासून राबविण्यात येत आहे. वरील शासन निर्णयानुसार राज्याच्या २१ जिल्हयातील ७३ पूर्णगट डोंगरी तालुके व ३५ उपगट डोंगरी तालुके असे डोंगरी विभागाचे क्षेत्र विशिष्ट निकषांच्या आधारे घोषित करण्यात आले आहे.

२. सन २००४-२००५ या आर्थिक वर्षापासून आदिवासी उपयोजना क्षेत्रात नियोजन विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या डोंगरी विभाग विकास कार्यक्रमासाठी लागणारी सर्व तरतूद सर्वसाधारण राज्य योजनांतर्गत निधीमधून करण्यात येत आहे. तसेच २००८-२००९ या आर्थिक वर्षापासून दरवर्षी प्रति पूर्णगट तालुक्यास रु.६०.०० लाख व प्रति उपगट तालुक्यास रु.३०.०० लाख याप्रमाणे निधी वितरीत केला जातो. परंतु या कार्यक्रमांतर्गत मार्गदर्शक तत्वानुसार घेण्यात येणाऱ्या अनुज्ञेय कामांसाठी हा निधी अपूरा पडत असल्याने लोकप्रतिनिधी यांचेकडून निधीमध्ये वाढ करण्याबाबत वारंवार विनंती करण्यात येत होती. त्यावर सारासार विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षापासून डोंगरी विभाग विकास कार्यक्रमांतर्गत समाविष्ट असलेल्या प्रति पूर्णगट डोंगरी तालुक्यास "रु.६०.०० लाख" याऐवजी "रु.८०.०० लाख" याप्रमाणे आणि प्रति उपगट डोंगरी तालुक्यास" रु.३०.०० लाख "याऐवजी "रु.४०.०० लाख" याप्रमाणे निधी वाढविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६०९२०५८३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ.कृ.जगताप

( अ. कृ. जगताप )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

४) शासनाचे मुख्य सचिव,
५) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७) सर्व विभागीय आयुक्त,
८ ) महालेखापाल १/२ , (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर ,
९ ) महालेखापाल १/२, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,
१०) जिल्हाधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, धुळे, नंदूरबार जळगांव,नाशिक,अहमदनगर, पुणे,सातारा, सांगली, कोल्हापूर, औरंगाबाद, हिंगोली, बीड, नांदेड, अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ,
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, धुळे, नंदूरबार, जळगांव,नाशिक,अहमदनगर,पुणे, सातारा,सांगली, कोल्हापूर, औरंगाबाद, हिंगोली, बीड, नांदेड, अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ,
१२) सर्व विशेष कार्य अधिकारी (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण, नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद विभाग,
१३) जिल्हा नियोजन अधिकारी ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग,धुळे, नंदूरबार, जळगांव, नाशिक, अहमदनगर, पुणे,सातारा, सांगली, कोल्हापूर, औरंगाबाद, हिंगोली, बीड, नांदेड, अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग,धुळे, नंदूरबार ,जळगांव,नाशिक, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, औरंगाबाद, हिंगोली, बीड, नांदेड,अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ,
१५) वित्त विभाग (अर्थोपाय/व्यय-८ व १४/अर्थसंकल्प-३ व १५),मंत्रालय,मुंबई,
१६) नियोजन विभाग (का.१४११ व १४२४) मंत्रालय,मुंबई,
१७) निवड नस्ती, (का. १४५५).